श्री हनुमंत दगडू सातपुते, रोजंदारी वाहनचालक यांच्या रोजंदारीवरील सेवा भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या आस्थापनेवर नियमित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र-०४२३/प्र.क्र.२५६/पापु-१५

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: १८ मार्च, २०२४

वाचा-

१. **शासन निर्णय क्रमांक: सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. रूअआ १५९६/२२८/ सेवा-५, दि.२४.०४.२००१**
२. **शासन निर्णय क्रमांक: पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र. आपना १००९/प्र.क्र. ३७/पापु-१५, दि.०१.०४.२०१५**
३. **आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचे पत्र क्र.प्रशासन/आस्था-६/सीआर १३/श्री सातपुते/रोजंदारी/अवमान याचिका/४८०/२०२३, दि.१६.१०.२०२३**

प्रस्तावना-

श्री. हनुमंत दगडू सातपुते हे वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, धाराशिव या कार्यालयात रोजंदारी वाहनचालक म्हणून कार्यरत आहेत. श्री हनुमंत सातपुते यांनी त्यांना शासन सेवेत नियमित करणेबाबत मा. औद्योगिक न्यायालय, सोलापूर येथे दाखल केलेल्या दावा क्र. २२२/१९९१ मध्ये मा. औद्योगिक न्यायालयाच्या दि.१४.१०.१९९८ रोजी झालेल्या आदेशाविरूद्ध शासनाच्या वतीने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ छत्रपती संभाजी नगर येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.४३७५/१९९९ मध्ये दि.२०.०६.२०१९ रोजीचे आदेशाच्या अनुपालनाबाबत अवमान याचिका क्र.६२६/२०२३ मा. उच्च न्यायालय, खंडपीठ छत्रपती संभाजी नगर येथे दाखल केलेली आहे. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील रोजंदारी कर्मचाऱ्यांना नियमित आस्थापनेवर घेण्याचा निर्णय संबंधित विभागांचे अभिप्राय घेऊन साधकबाधक विचाराअंती मा. मंत्रीमंडळाच्या मान्यतेने घेण्यात आलेला असून त्याअनुषंगाने दि.०१.०४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये २६ रोजंदारी कर्मचाऱ्यांना नियमित करण्यात आलेले आहे. श्री सातपुते हे दीर्घकालीन सेवेत असतील व

त्यांना समायोजित करता येणे शक्य असेल तर ८ वी उत्तीर्ण ही शैक्षणिक अर्हता शिथील करून नियमितपणाचे लाभ देण्याबाबत योग्य ते आदेश निर्गमित करणेबाबत मा. उच्च न्यायालयाचे दि.२०.०६.२०१९ रोजीचे आदेश आहेत. रोजंदारीवरील कर्मचा-यांबाबत मा. मंत्रीमंडळाच्या मान्यतेने निर्गमित शासन निर्णय दि.०१.०४.२०१५ नुसारचे सर्वसाधारण धोरण व मा. उच्च न्यायालयाचे दि.२०.०६.२०१९ च्या आदेशाच्या अनुषंगाने श्री हनुमंत सातपुते, रोजंदारी वाहनचालक यांना शासन सेवेत नियमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

श्री हनुमंत दगडू सातपुते, रोजंदारी वाहनचालक, यांचे प्रकरणी मा. उच्च न्यायालय खंडपीठ छत्रपती संभाजी नगर यांनी रिट याचिका क्र.४३७५/१९९९ मध्ये दि.२०.०६.२०१९ रोजी दिलेले अंतिम आदेश व दि.०१.०४.२०१५ चा शासन निर्णय विचारात घेता श्री हनुमंत सातपुते हे केवळ ४ थी उत्तीर्ण असले तरी ते दि.१५.०४.१९८९ पासून सलग रोजंदारी सेवेवर कार्यरत असल्याचे विचारात घेऊन मा. उच्च न्यायालयाने त्यांची ८ वी उत्तीर्ण ही शैक्षणिक अर्हता शिथिल करणेबाबत दिलेल्या निर्देशास अनुसरून ८ वी उत्तीर्ण ही शैक्षणिक अर्हता केवळ या प्रकरणी शिथिल करून मा. उच्च न्यायालयाच्या आदेशाच्या दिनांकापासून म्हणजेच दि.२०.०६.२०१९ पासून उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, छत्रपती संभाजी नगर या विभागात वाहन चालक या पदावर श्री हनुमंत दगडू सातपुते यांना समायोजित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय दि.२४.०४.२०२३ अन्वये भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेचा आकृतीबंध सुधारित करण्यात आला असून वाहन चालक हे पद मृत संवर्ग म्हणून घोषित करण्यात आले असल्याने श्री सातपुते यांना तत्कालीन स्थितीत ज्या रिक्त पदावर समायोजित करण्यात येईल ते पद सुधारित आकृतीबंधाच्या दि.२४.०४.२०२३ पासून मृत संवर्गात गणण्यात येईल व सेवानिवृत्ती/राजीनामा अथवा अन्य कारणास्तव रिक्त झाल्यास पद व्यपगत होईल.

वर्ग-३ व वर्ग-४ या पदांच्या नियुक्तीबाबतचे अधिकार आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना आहेत. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी श्री हनुमंत सातपुते यांचे प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दिलेले आदेश विचारात घेऊन श्री हनुमंत सातपुते यांच्या सेवा नियमित करण्याचे आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

श्री हनुमंत सातपुते यांना नियमित केल्यानंतर त्यांचे वेतनाकरिता येणारा खर्च भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील वर्ग-४ च्या कर्मचा-यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्याच लेखाशीर्षाखाली मंजूर तरतूदीतून भागवण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३०/व्यय-३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१८११५७४२९५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MAHADEV GENGAJE

Digitally signed by RAJENDRA MAHADEV GENGAJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=9e6d5121ea1547c5b6abac50546c582bc9cb02d8c4ee0e57eb3442ad725208b5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D90328C2FC4E73B881BCFEA3BC5824FA462A2EC1E4EAD4BFE3B4979112BDB493, cn=RAJENDRA MAHADEV GENGAJE
Date: 2024.03.18 15:50:56 +05'30'

**(रा. म. गेंगजे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
५) प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर
६) वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, धाराशिव
७) महालेखाकार, लेखापरिक्षा/अनुज्ञेयता १/२, नागपूर/ मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर
९) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१०) निवडनस्ती